**"महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSI-CDP)" अंतर्गत चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या उद्योग समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी अंतिम टप्प्यातील अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.६९/ उद्योग-७**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक १९/०३/२०२५

<u>**संदर्भ**</u>:- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१३/ प्र.क्र.२०७/ उद्योग-७, दिनांक २५/०२/२०१४.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१९/ प्र.क्र.९३/उद्योग-७, दिनांक २४/०७/२०१९.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एमएसई-२०२१/ प्र.क्र.१८६/उद्योग-७, दिनांक०२/०८/२०२१.

४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एसएमई-२०२०/ प्र.क्र.११९/ उद्योग-७, दिनांक २६/०३/२०२१.

५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.७६/उद्योग-७, दिनांक ३१/०३/२०२२.

६) राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दिनांक ०५/०८/२०२२ रोजी संपन्न १५ व्या बैठकीचे इतिवृत्त.

७) उद्योग संचालनालयाचे अंतिम मंजूरी आदेश क्र. DI/Cluster/CFC/FA/Chilli Powder & Spices Cl./Nagpur/2023/C-2408, दिनांक २३/०२/२०२३.

८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.क्लस्टर-२०२३/ प्र.क्र.६९/उद्योग-७, दिनांक ०६/०६/२०२३.

९) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आयएलई-२०२३/ प्र.क्र.१४२/प्रशासन-३, दिनांक २४/०७/२०२३.

१०) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.क्लस्टर-२०२३/ प्र.क्र.६९/उद्योग-७, दिनांक ०१/०३/२०२४.

११) उद्योग उप संचालक (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ एमएसआयसीडीपी/ CFC/ अनुदान वितरण/ २०२५/ अे-४९, दिनांक १५/०१/२०२५.

<u>**प्रस्तावना**</u> **:-**

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समूहांचा समूह विकास होऊन त्याद्वारे सूक्ष्म व लघु घटकांच्या सर्वांगीण विकासास चालना मिळणेसाठी "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" ही योजना दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म व लघु उपक्रमाच्या सर्वांगिण विकास व वाढीकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी तसेच सामायिक सुविधा उभारणीसाठी राज्य शासनाचे अनुदान देण्यात येते.

२. उद्योग संचालनालयाच्या दिनांक १५/०१/२०२५ रोजीच्या प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार, चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या औद्योगिक समूह प्रकल्पाकरीता सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी रुपये ५,८९,६९,०००/- इतक्या रकमेस प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील स्थापित राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दिनांक ०५/०८/२०२२ रोजी संपन्न १५ व्या बैठकीत अंतिम मंजूरी देण्यात आलेली आहे. त्याकरीता राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये ४,७१,७५,०००/- (८०%) इतके असून मे. भिवापूर चिली प्रोसेसिंग फाऊंडेशन, जि.नागपूर या विशेष हेतू वाहन संस्थेची सहभाग वर्गणी रुपये १,१७,९४,०००/- इतकी आहे. सदर औद्योगिक समूह प्रकल्पात १००% सूक्ष्म घटक असल्याने या प्रकल्पाची विशेष हेतू वाहन संस्था मे. भिवापूर चिली प्रोसेसिंग फाऊंडेशन, जि.नागपूर, दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, प्रकल्प किमतीच्या ८०% पर्यंत राज्य शासनाचे अनुदान मिळण्याकरीता पात्र आहे. त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून दिनांक २३/०२/२०२३ रोजी अंतिम मंजूरी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

३. उद्योग संचालनालयाकडून दिनांक १५/०१/२०२५ रोजीच्या पत्रासोबत सादर करण्यात आलेल्या Final Closure Report नुसार, सामायिक सुविधा केंद्र उभारणीअंतर्गत स्पर्धात्मक निविदा प्रक्रियेमुळे प्रकल्पाची मूळ किंमत कमी होऊन ती रुपये ५,७२,०७,०००/- इतकी झाली आहे. सुधारीत प्रकल्प किमतीनुसार रुपये ४,५७,६६,०००/- इतके राज्य शासनाचे अनुदान मंजूरीस पात्र असून, उद्योग संचालनालयाकडून त्या-त्या वेळी प्रस्तावित केल्याप्रमाणे, त्यापैकी रुपये ३,८३,९१,०००/- (क्षमतावृद्धी कार्यक्रमासाठी व CFC उभारणीसाठी) इतके अनुदान यापूर्वी वितरीत करण्यात आले आहे. त्याचा टप्पानिहाय अनुदान वितरण तपशिल पुढील तक्त्यात नमूद केला आहे :-

| अ.क्र. | कार्यक्रम तपशिल | शासन निर्णय | अनुदान (रुपये) | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | क्षमतावृध्दी कार्यक्रम (१ ला टप्पा- ६०%) | संदर्भ क्र. ४ | ४,७८,०००/- | विनियोग प्रमाणपत्र प्राप्त |
| २. | क्षमतावृध्दी कार्यक्रम (२ रा टप्पा- ४०%) | संदर्भ क्र. ५ | १,७३,०००/- (*) | विनियोग प्रमाणपत्र प्राप्त |
| ३. | CFC उभारणी (१ ला टप्पा-२०%) | संदर्भ क्र. ८ | ९४,३५,०००/- | विनियोग प्रमाणपत्र प्राप्त |
| ४. | CFC उभारणी (२ रा टप्पा-६०%) | संदर्भ क्र. १० | २,८३,०५,०००/- | विनियोग प्रमाणपत्र प्राप्त |
| (*क्षमतावृध्दी कार्यक्रमाकरीता प्रथम टप्प्यात वितरीत रुपये ४.७८ लक्ष पैकी रुपये १.४५ लक्ष बचत झाल्यामुळे उक्त प्रकल्प संस्थेला दुस-या टप्प्यातील मंजूर अनुदान रुपये ३.१८ लक्षपैकी रुपये १.७३ लक्ष निधी प्राप्त झाला आहे.) | | | | |

४. उद्योग संचालनालयाच्या दिनांक १५/०१/२०२५ रोजीच्या प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार, चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या औद्योगिक समूह प्रकल्पांतर्गत सामायिक सुविधा केंद्र यशस्वीपणे पूर्ण झाल्याबाबतचे प्रमाणपत्र तसेच राज्य शासनाचे दुस-या टप्प्यातील वितरीत अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग सह संचालक, नागपूर यांनी उद्योग संचालनालयामार्फत सादर केले आहे. त्याअनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यातील अंतिम टप्प्यातील रुपये ७३,७५,०००/- इतक्या अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्य शासनाच्या "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" या योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी, प्रकल्प मंजूरीप्रमाणे तसेच MSICDP योजनेच्या तरतूदीनुसार, राज्य शासनाच्या हिश्श्यातील अंतिम टप्प्यातील अनुदान रुपये ७३,७५,०००/-(रुपये त्र्याहत्तर लक्ष पंच्च्याहत्तर हजार फक्त) इतक्या अनुदानाच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रुपये ७३,७५,०००/- इतकी अनुदानाची रक्कम चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या समूह प्रकल्पाच्या मे. भिवापूर चिली प्रोसेसिंग फाऊंडेशन, जि. नागपूर या विशेष हेतू वाहन संस्थेला अदा

करण्यासाठी आहरण व संवितरणाची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांची राहील.

**३.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व त्यासोबतचे परिशिष्टामध्ये नमूद तरतूदी तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

i. "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम"ही योजना दिनांक दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. योजनेचा उद्देश, कालावधी, अंमलबजावणी यंत्रणा, प्रकल्प मंजूरी प्रक्रिया, त्याअनुषंगाने विविध मंजूरीस्तव समिती, अंमलबजावणी कार्यपध्दती, अनुदान वितरण इत्यादीची माहिती दिलेली आहे. तसेच दिनांक २४/०७/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची व्याप्ती वाढविण्यात आली आहे.

ii. चिली पावडर अँड स्पाईसेस क्लस्टर, भिवापूर जि. नागपूर या औद्योगिकसमूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी रुपये ५,८९,६९,०००/- एवढ्या प्रकल्प किमतीस प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय सुकाणू समितीने दिनांक ०५/०८/२०२२ रोजीच्या बैठकीमध्ये अंतिम मंजूरी दिली आहे. दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सदर औद्योगिक समूह प्रकल्पात १००% सूक्ष्म घटक असल्याने प्रकल्प किमतीच्या ८०% पर्यंत राज्य शासनाचे अनुदान मिळण्याकरीता सदर प्रकल्प संस्था पात्र आहे. त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून दिनांक २३/०२/२०२३ रोजी अंतिम मंजूरी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

iii. सदर योजनेंतर्गत यापूर्वी वितरीत ७५% पेक्षा जास्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आले आहेत.

iv. सदरप्रकल्पास यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाबाबत लेखापरिक्षकांकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.

v. निधी मंजूरीप्राप्त प्रकल्पाच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे.

**४.** सदर समूह प्रकल्पाच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय अनुदानाच्या सुयोग्य विनियोगावर देखरेख ठेवण्याची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांची राहील.

**५.** सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०२-लघुउद्योग, (००) (२४) महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (कार्यक्रम) (२८५१ ६३७८), ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणाराप्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षता घेण्यात येईल.

**६.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व दिनांक १२/०२/२०२५ मधील सूचनांची व त्यासोबतच्या परिशिष्टात नमूद तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत असल्याने तसेच नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३३/का.१४६१, दिनांक ११/०२/२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.५३/२०२५/व्यय-१६, दिनांक १३/०२/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३१९१९१८५३७६१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.19 19:20:18 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणककक्ष, नवीनप्रशासनभवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय, नागपूर. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, नागपूर. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) मे. भिवापूर चिली प्रोसेसिंग फाऊंडेशन, जि.नागपूर.(उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) कक्ष अधिकारी (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती (उद्योग-७).